महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयास सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी “०१-वेतन” या उद्दीष्टासाठी अनुदान वितरित करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः बियुडी २०२०/प्र.क्र.५८ (भाग-१)/का.४

मादाम कामा रोड, राजगुरु हुतात्मा चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ०८.०६.२०२०

**वाचा-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२०/प्र.क्र. ६४/अर्थ-३, दि.१६ एप्रिल, २०२०
२) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक:बियुडी २०२०/प्र.क्र. ५८/का-४, दि. २८ एप्रिल, २०२०
३) पीठासीन अधिकारी/अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांचे पत्र, क्रमांक:२०२०/म.रा.वक्फ न्या./लेखा/१८२/,दि.१८.०५.२०२०

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयास सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून अनिवार्य खर्चासाठी अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयासाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात रु.१,४६,१५,०००/- (रुपये एक कोटी सेहचाळीस लाख पंधरा हजार मात्र) इतके अनिवार्य खर्चासाठी अनुदान मंजूर करण्यात आलेले आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील परिपत्रकान्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन वक्फ न्यायाधिकरणासाठी संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये रु.१४,५७,५००/- इतके अनुदान वितरित करण्यात आलेले आहे. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांनी त्यांच्या संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये मागणी केल्यानुसार आता वित्त विभागाने माहे एप्रिल ते जून, २०२० या तीन माहेसाठी “०१ वेतन” या उद्दीष्टासाठी २५% इतके अनुदान वितरित करण्यास मान्यता दिलेली आहे. यापूर्वी संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये “०१ वेतन” या उद्दीष्टासाठी १०% प्रमाणे रु.१२,७७,१००/- इतके अनुदान वितरित करण्यात आले असून आता वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन उर्वरित १५ % म्हणजे रु.१९,१५,६५०/- (रुपये एकोणीस लाख पंधरा हजार सहाशे पन्नास मात्र) इतके अनुदान महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयासाठी खाली दर्शविलेल्या मासिक निधी विवरणाप्रमाणे अध्यक्ष, महाराट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांनी खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी.

| “मागणी क्र.झेडई-१, २०५३, जिल्हा प्रशासन, (००) (१०१), आयुक्त (००) (०१) आयुक्त, औरंगाबाद, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, आस्थापना खर्च (२०५३१२५ ८)” | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | लेखाशिर्ष तपशीलवार | सन २०२०-२१ साठी अर्थसंकल्पीय अंदाज | माहे एप्रिल २०२० ते माहे जुन, २०२० साठी उपलब्ध करून दिलेले अनुदान | वितरित तरतूद | वितरणासाठी उपलब्ध अनुदान | वितरीत करावयाचे अनुदान | |
| | | | | | | मे, २०२० | जून, २०२० |
| १ | ०१ वेतन | १,२७,७१,०००/- | ३१,९२,७५०/- | १२,७७,१००/- | १९,१५,६५०/- | ९,५७,८२५/- | ९,५७,८२५/- |
| | **एकूण** | **१,२७,७१,०००/-** | **३१,९२,७५०/-** | **१२,७७,१००/-** | **१९,१५,६५०/-** | **९,५७,८२५/-** | **९,५७,८२५/-** |

उपरोक्त खर्च “मागणी क्र.झेडई-१, २०५३, जिल्हा प्रशासन, (००)(१०१), आयुक्त (००)(०१) आयुक्त, औरंगाबाद, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, आस्थापना खर्च (२०५३१२५ ८) अनिवार्य” या लेखाशीर्षाखाली खर्च टाकण्यात यावा.

हा शासन निर्णय, वित्त विभाग, अनौ.संदर्भ क्रमांक : ८१/२०२०/व्यय-१ , दि.१.६.२०२० अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६०८१५४४५५८३१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tushar Dilip Rathod

Digitally signed by Tushar Dilip Rathod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e7e9706be693397ead11bd0e0b8fbaec4548852 9c8b57466dbf3e7c095089c08, serialNumber=b88babb31cb2c1163b5a1e41e86d80927 2fea91481473460 0d0b42642848c06f, cn=Tushar Dilip Rathod
Date: 2020.06.08 16:40:07 +05'30'

( तुषार दि. राठोड )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अध्यक्ष/पीठासीन अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद,
२. जिल्हाधिकारी, औरंगाबाद,
३. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
४. महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
५. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
६. उपसचिव (कोषा/प्र.१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. कार्यासन अधिकारी (का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. निवडनस्ती/कार्यासन-४ संग्रहार्थ.